पुणे वनवृत्तातील भांबुर्डा वनपरिक्षेत्रातील मौजे पांचगाव पर्वती व मौजे वारजे येथील वनक्षेत्रासभोवती संरक्षक भिंत बांधण्याच्या कामास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक :- एस-१०/२०१७/प्र.क्र.१०४/फ-३,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,

दिनांक : १७ मार्च, २०१७.

**वाचा :-**

अपर प्रधान मुख्य वनंसरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) यांचे पत्र क्र.-कक्ष-२४(३)/वअ/ १०७५/१६-१७, दिनांक ०८.०२.२०१७.

**प्रस्तावना :**

राखीव वनाचे सर्व्हेक्षण, जमाबंदी व सिमांकन योजने अंतर्गत पुणे येथील भांबुर्डा वनपरिक्षेत्रातील मौजे पांचगाव पर्वती सर्व्हे क्र. १ व मौजे वारजे सर्व्हे क्र. १२० येथील वनक्षेत्रासभोवती संरक्षक भिंत बांधकाम करण्यासाठीच्या २ अंदाजपत्रकांस वन अभियंता, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांची तांत्रिक मान्यता घेवून प्रशासकीय मान्यतेसाठीचा प्रस्ताव अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), नागपूर यांनी उपरोक्त संदर्भिय पत्रान्वये शासनास सादर केला होता. सदर प्रस्तावास मान्यता देण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

**१)** पुणे वनवृत्तातील भांबुर्डा वन परिक्षेत्रातील मौजे पांचगाव पर्वती सर्व्हे क्र. १ व मौजे वारजे सर्व्हे क्र. १२० येथील वनजमिनीवर संरक्षक भिंतीचे बांधकाम करण्यासाठीच्या २ अंदाजपत्रकांस खालील नमूद तपशिलाप्रमाणे तसेच अटी व शर्तीच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता (वित्तीय मान्यता वगळून) प्रदान करण्यात येत आहे :-

| अ.क्र. | कामाचे नाव | प्रशासकीय मान्यता प्रदान रक्कम |
|---|---|---|
| १ | Construction of RCC Compound Wall at Pachgaon Parvati F. Sr. 1 in Bhamburda Range of Pune Division | रु .१,०२,११,०००-/ |
| २ | Construction of RCC Compound Wall at Warje F. Sr. 120 in Bhamburda Range of Pune Division | रु .३१,०७,०००-/ |
| | Total | **रु .१,३३,१८,०००-/** |

**अटी व शर्ती** -

अ) सदर काम करण्यापूर्वी संरक्षक भिंतीचे संकल्पन सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सक्षम अधिकाऱ्यांकडून मंजूर करुन घेण्यात यावे.

ब) काम सुरु करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची तसेच वनक्षेत्राच्या सीमेंची खात्री करावी.

क) दोन्ही कामाच्या एकत्रित निविदा करुन काम हाती घेण्यात यावे.

३) हे आदेश शासन निर्णय वित्त विभाग, क्रमांक विअप्र.१०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दिनांक १५.०५.२००९, वित्तीय अधिनियम नियम पुस्तीका, १९७८, भाग पहिला, उप विभाग-पाच अनुसार महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिका अंतर्गत प्रदान करण्यात आलेले वित्तीय अधिकार, अ.क्र.१, परिच्छेद क्र. १३४ अनुसार विभागास असलेल्या वित्तीय अधिकारानुसार व सार्वजनिक बांधकाम विभाग यांच्या सहमतीने, निर्गमित करण्यात येत आहे.

४) सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०३१७१४४९१५२३१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

Virendra R Tiwari

Digitally signed by Virendra R Tiwari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a95e1a9759002ee190cd79464daaba7dc840ec375cd62a646a64986631086810, cn=Virendra R Tiwari
Date: 2017.03.17 14:50:31 +05'30'

(वीरेंद्र तिवारी)
मुख्य वनसंरक्षक (मंत्रालय)

प्रत :-

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संधारण) महाराष्ट्र राज्य, नागपूर
४) मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), पुणे.
५) मुख्य वनसंरक्षक (भूमी अभिलेख कक्ष), नागपूर.
६) वनसंरक्षक, भूमी अभिलेख कक्ष, ठाणे स्थित पनवेल.
७) उप वनसंरक्षक, पुणे.
८) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
९) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
१०) वित्त विभाग, व्यय १०/ अर्थसं-४ मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
११) कार्यासन अधिकारी (फ-२) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१२) कार्यासन अधिकारी, ब-१, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१३) निवडनस्ती, कार्यासन (फ-३), म.व.व.वि., मंत्रालय, मुंबई-३२.